सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात ३६ - सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाखाली पुरवणी मागणीद्वारे मंजुर निधी ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रांना वितरित करण्याबाबत. मुख्य लेखाशिर्ष-२०५३०५७४.

(जून २०२४ चे अर्थसंकल्पीय अधिवेशन)

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पूरक-२०२४/प्र.क्र.१०५/आस्था-१५**
**बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,**
**फोर्ट, मुंबई- ४०० ००१**
**दिनांक : २१ ऑगस्ट, २०२४.**

वाचा -

१. ग्राम विकास व जलसंधारण विभागाकडील शा.नि.क्र.प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र.८४५/०९, दि. १७.०९.१९९३
२. ग्राम विकास व जलसंधारण विभागाकडील शा.परिपत्रक क्र.प्रशिक्षण ११९९/प्र.क्र.५८१/६१, दि.२३.९.१९९८.
३. ग्राम विकास व जलसंधारण विभागाकडील शा.परिपत्रक क्र.प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.
४. ग्राम विकास विभागाकडील शा.नि.क्र.प्रशिक्षण-२०१९/प्र.क्र.३४/आस्था-१५, दि.०५.१२.२०१९
५. महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०२४ (सन २०२४ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.-२८) दि.२५.०७.२०२४.
६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक-२०२४/प्र.क्र.७९/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.

प्रस्तावना -

ग्रामविकास व पंचायतराज विभागामार्फत राज्यात ६ शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, १ संयुक्त प्रशिक्षण केंद्र, ११ पंचायतराज प्रशिक्षण केंद्र तसेच ३ ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र कार्यरत आहेत. यापैकी खाजगी संस्थांमार्फत चालविण्यात येत असलेली ११ पंचायतराज प्रशिक्षण केंद्र, ३ ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र व १ संयुक्त प्रशिक्षण केंद्र यांना राज्य शासनामार्फत ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) व ३६, सहाय्यक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाकरीता १००% अनुदान वितरित करण्यात येते.

दि.०५.१२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये खाजगी संस्थांमार्फत संचलित शासन अनुदानित उपरोक्त केंद्रातील अध्यापक व अध्यापकेतर संवर्गांना ७ व्या वेतन आयोगाची संरचना लागू करण्यात आली आहे. तथापि, त्यांना दि.०१.०१.२०१६ ते दि.३१.१२.२०१८ या तीन वर्षाच्या कालावधीतील ७ व्या वेतन आयोगाची थकबाकी अदा करणे प्रलंतित आहे. त्यानुसार ३६, सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाखाली दि.०१.०१.२०१६ ते दि.३१.१२.२०१८ या तीन वर्षाच्या कालावधीतील ७ व्या वेतन आयोगाची थकबाकी तसेच सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता ११ पंचायतराज प्रशिक्षण केंद्रांना वेतनाकरीता अपूरा पडलेल्या निधीची प्रतिपुर्ती करणे आवश्यक आहे.

त्यानुसार ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रांना ३६, सहायक अनुदाने (वेतन) उद्दिष्टाखाली ७ व्या वेतन आयोगाची थकबाकी रक्कम रु.१०२५७.५३५ हजार व सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता वेतनाकरीता रु.३६४९.१९२ हजार इतका अपूरा पडलेला निधी असा एकुण रु.१३९०७.०० हजार (रुपये एक कोटी एकोणचाळीस लक्ष सात हजार फक्त) पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करुन देण्यासाठी विधीमंडळाच्या जून, २०२४ चे अर्थसंकल्पीय अधिवेशनामध्ये पुरवणी मागणी प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास विधानमंडळाची मान्यता प्राप्त झालेली आहे. त्याअनुषंगाने पुरवणी मागणीद्वारे प्राप्त निधी सदर निधी ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रातील अध्यापक व अध्यापकेतर संवर्गांची दि.०१.०१.२०१६ ते दि.३१.१२.२०१८ या तीन वर्षाच्या कालावधीतील ७ व्या वेतन आयोगाची थकबाकी व सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता वेतनाकरीता अपूरा पडलेला निधीबाबतचा खर्च भागविण्याकरीता ३६, सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाखाली रु.१,३९,०७,०००/- (रुपये एक कोटी एकोणचाळीस लक्ष सात हजार फक्त) इतका निधी सोबत जोडलेल्या परिशिष्टानुसार अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (BDS / BEAMS) उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण-११९८/प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२ जून, २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने सर्व संबंधित उपायुक्त (आस्था) यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास हा निधी अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी.

३. सदर निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे, त्याच बाबींवर खर्च करण्याची तसेच मंजूर निधीच्या मर्यादेत खर्च करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्थापना), विभागिय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ शासनास सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. हा खर्च “मागणी क्र.एल-२, २०५३, जिल्हा प्रशासन-०९३ जिल्हा आस्थापना (०६) (०१) पंच, सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण-राज्यक्षेत्र, संकेतांक क्र.२०५३ ०५७४, ३६, सहाय्यक अनुदाने (वेतन)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सदर लेखाशिर्षाचे नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित उपायुक्त (आस्थापना) हे काम पाहतील. तसेच पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करुन दिलेला सदर निधी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात खर्ची पडेल याची संबधित उपायुक्त (आस्थापना) यांनी दक्षता घ्यावी. सदर खर्च ज्या उद्दिष्टासाठी वितरित करण्यात आलेला आहे त्याच उद्दिष्टासाठी खर्च पडतो आहे याबाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी.

५. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या उप विभाग - ३ मधील अ.क्र. ४ परि. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून तसेच वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्र.५१७/२०२४/व्यय-१५, दि.०७.०८.२०२४ व दि.१४.०८.२०२४ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८२११५२४२३६९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SEEMA BABAN JADHAV
Date: 2024.08.21 18:11:58 +05'30'

(सीमा जाधव)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत :
१. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड , पुणे.
२. विभागीय आयुक्त , सर्व (प्रत्येकी २ प्रती)
३. संचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
४. उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण, पुणे, छ.संभाजीनगर, नागपूर, अमरावती व नाशिक.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, कोकण, पुणे, छ.संभाजीनगर,नागपूर , अमरावती व नाशिक.
६. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई.
७. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - २, नागपूर.
८. वित्त विभाग , कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५
९. प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, (सर्व) .
१०. कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-६, वित्त-७ ग्राम विकास विभाग (२ जादा प्रतींसह)
११.निवड नस्ती का .क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग .

## परिशिष्ट

| शासन निर्णय क्र.पूरक-२०२४/प्र.क्र.१०५/आस्था-१५, दि.२१ ऑगस्ट, २०२४ | | | | |
|---|---|---|---|---|
| सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात वेतन उद्दिष्टाखाली पूरवणी मागणीद्वारे मंजूर निधी वितरण (प्रत्यक्षात रुपये) | | | | |
| अ. क्र. | पंचायत राज प्रशिक्षण केंद्राचे नाव | दि.०१.०१.२०१६ ते दि.३१.१२.२०१८ या तीन वर्षाच्या कालावधीतील ७ व्या वेतन आयोगाची थकबाकी | सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता वेतनाकरीता अपूरा पडलेला निधी | एकुण |
| १ | कोसबाड हिल, जि.पालघर | ८,९२,००० | १४,८२,००० | २३,७४,००० |
| **अ)** | **विभागीय आयुक्त, कोकण** | **८,९२,०००** | **१४,८२,०००** | **२३,७४,०००** |
| २ | वर्ये, जि.सातारा | ९,२१,००० | ०० | ९,२१,००० |
| ३ | गारगोटी, जि.कोल्हापूर | १३,३४,००० | ०० | १३,३४,००० |
| ४ | गौडगांव, जि.सोलापूर | ८,३२,००० | ०० | ८,३२,००० |
| **ब)** | **विभागीय आयुक्त, पुणे** | **३०,८७,०००** | **००** | **३०,८७,०००** |
| ५ | मुरुड, जि.लातूर | १०,३५,००० | ४,४२,००० | १४,७७,००० |
| **क)** | **विभागीय आयुक्त, छ.संभाजीनगर** | **१०,३५,०००** | **४,४२,०००** | **१४,७७,०००** |
| ६ | हनुमान नगर, जि.नागपूर | ८,८३,००० | ०० | ८,८३,००० |
| ७ | मूल, जिल्हा चंद्रपूर | ११,८५,००० | ८,५०,००० | २०,३५,००० |
| **ड)** | **विभागीय आयुक्त, नागपूर** | **२०,६८,०००** | **८,५०,०००** | **२९,१८,०००** |
| ८ | खिरोदा, जि.जळगाव | ४,०३,००० | १,२२,००० | ५,२५,००० |
| **इ)** | **विभागीय आयुक्त, नाशिक** | **४,०३,०००** | **१,२२,०००** | **५,२५,०००** |
| ९ | खामगांव, जि.बुलढाणा | ११,६५,००० | ०० | ११,६५,००० |
| १० | शिवाजीनगर, जि.अमरावती | ८,५२,००० | ७,५३,००० | १६,०५,००० |
| ११ | पुसद, जि.यवतमाळ | ७,५६,००० | ०० | ७,५६,००० |
| **ई)** | **विभागीय आयुक्त, अमरावती** | **२७,७३,०००** | **७,५३,०००** | **३५,२६,०००** |
| | **अ)+ब)+क)+ड)+इ)+ई)** | **१,०२,५८,०००** | **३६,४९,०००** | **१,३९,०७,०००** |

Digitally signed by SEEMA BABAN JADHAV
Date: 2024.08.21 18:12:54 +05'30'

(सीमा जाधव)
उप सचिव, महाराष्ट्र शासन